औरंगाबाद विभागातील महाराष्ट्र विकास सेवा,
गट-ब मधील अधिका-यांच्या बदल्या/नियुक्त्या

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन आदेश, क्रमांक : मविसे १० / २०११ /प्र.क्र. ४५(भाग-३) /आस्था-३अ
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २६ जुलै, २०११

**संदर्भ :- शासन आदेश, क्रमांक : मविसे १० / २०११ /प्र.क्र. ४५/आस्था-३अ, दि.२५.५.२०११**

**आदेश:-** सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पांडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-याच्या मान्यतेने ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या अधिपत्याखालील औरंगाबाद विभागातील महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील काही अधिका-यांच्या बदल्या संदर्भाधीन आदेशान्वये करण्यात आल्या आहेत. सदर आदेशातील अनुक्रमांक ५ येथील **श्री. जे. डी. गोरे, गट विकास अधिकारी, पंचायत समिती, मुदखेड, जिल्हा नांदेड** यांच्या बाल विकास प्रकल्प अधिकारी, बदनापूर, जिल्हा जालना येथे करण्यात आलेल्या पदस्थापनेत अंशत: बदल करुन या आदेशान्वये त्यांची बदलीने पदस्थापना **गट विकास अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड** या नियोजन विभागाने दि.३१.५.२०११ च्या शासन निर्णयान्वये नव्याने निर्माण केलेल्या पदावर करण्यात येत आहे.

२. **श्री. जे. डी. गोरे** यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२ / २५६७ / २८ / अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिका-याला त्यांच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. **श्री. जे. डी. गोरे** यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

५. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०७२६१७२४२५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( स. रि. बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति

१. संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजना संचालनालय, नवी मुंबई
२. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड, जालना
४. महालेखापाल- २ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, नागपूर

५. **संबंधित अधिकारी द्वारा मु.का.अ.जि.प यांचे मार्फत**
६. मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
७. मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
८. मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
९. कार्यासन क्रमांक : आस्था - २ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१०. निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक :आस्था-३अ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.